**वर्कप्लॅन अंतर्गत केंद्र पुरस्कृत तृणधान्य विकास कार्यक्रम**
**<u>सन २००९-१० मध्ये राबविण्यास वित्तीय मान्यता देण्याबाबत.</u>**

महाराष्ट्र शासन
कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक-सीपीपी-१६०९/प्र.क्र.११९/४-अे
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : ३१ मार्च,२०१०

संदर्भ :- १) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्रमांक-सीपीपी-१६०९/सीआर ११९/४-अे दिनांक २८ जुलै,२००९ व दिनांक १० मार्च,२०१०
२) शासन निर्णय,कृषि व पदुम विभाग, क्रमांक-पुनर्वि- १००९/भाग -१०/ प्र.क्र १९४/०९ /२ अे दिनांक ३१ मार्च,२०१०

**<u>शासन निर्णय</u> :-**

सन २००९-१० या वर्षासाठी केंद्र शासनाने त्यांच्या दिनांक ३० जून,२०१० च्या पत्रान्वये केंद्र पुरस्कृत तृणधान्य विकास कार्यक्रम राबविण्यासाठी रुपये ९७१.०२ लाख (रुपये नऊ कोटी एकाहत्तर लाख दोन हजार फक्त) एवढया कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता दिली आहे. यामध्ये केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा अनुक्रमे ७५.२५ नुसार रु. ७२८.२० लाख (रुपये सात कोटी अठ्ठावीस लाख वीस हजार फक्त ) व रु.२४२.७५ (रुपये दोन कोटी बेचाळीस लाख पंचाहत्तर हजार फक्त) असा आहे. केंद्र शासनाची मान्यता व कृषि आयुक्तालयाचे दि.१८.७.२००९ व दिनांक ४.३.२०१० चे पत्र विचारात घेऊन सदर योजना राज्यात राबविण्यासाठी केंद्र हिश्श्यापोटी एकूण रु.४६१.०३ लाख (रुपये चार कोटी एकसष्ट लाख तीन हजार फक्त ) निधीच्या व राज्य हिश्श्यापोटी रु.१००.०० लाख (रुपये एक कोटी फक्त) एवढया निधीच्या कार्यक्रमास अ.क्र.१ येथे संदर्भाधीन शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. याव्यतिरिक्त संदर्भ क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये सदर योजना सन २००९-१० मध्ये राबविण्यासाठी रु.२६७.२३ लाख (रुपये दोन कोटी सदुसष्ट लाख तेवीस हजार फक्त) एवढा पुनर्विनियोजनाने उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी मुक्त करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. या योजनेसाठी मंजूर केलेला निधी खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २००९-१० च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

अ) मागणी क्रमांक-डी-३,
२४०१ पीक संवर्धन १०२, अन्नधान्य पिके,
महाराष्ट्र राज्य परिषद व पंचायत समित्या अधिनियम १९६१ च्या
कलम २३ अन्वये जिल्हा परिषदांना अनुदान ( स्थानिक क्षेत्रातील योजना)
(अर्थोपाय अग्रिमाशी समायोज्य)
(केंद्र हिस्सा ) जिल्हा परिषदांना अर्थसहाय्य
(००) (२५) एकात्मिक तृणधान्य विकास कार्यक्रम
(२४०१ ४६१४) ३१ सहाय्यक अनुदान

२.	या कार्यक्रमासाठी मंजूर केलेला निधी खर्च करण्यास संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे तसेच मंजूर निधीचे जिल्हानिहाय वितरण करण्यास संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. या योजनेचा खर्च मासिक कॅश फ्लोच्या मर्यादेत राहील याची दक्षता घेण्याची व संगणकीय अर्थसंकल्पीय प्रणालीद्धारे वितरित करण्याची जबाबदारी **संचालक (विस्तार व प्रशिक्षण) कृषि आयुक्तालय, पुणे** यांची राहिल.

३.	केंद्र पुरस्कृत तृणधान्य विकास कार्यक्रम संदर्भाधीन दिनांक २८.७.२००९ मधील शासन निर्णयातील परिच्छेद ३ येथील अटीनुसार राबविण्यात यावा.

४.	केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे या योजनेचा मासिक आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल प्रत्येक महिन्याला विहित मुदतीत केंद्र शासनाला तसेच राज्य शासनाला सादर होईल याची दक्षता घेण्यात यावी.

५.	**हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ८८ /१० /व्यय-१, दिनांक ३१ मार्च, २०१० अन्वये व प्रधान सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.**

६.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन दिला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००४१५१६५७०२००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**(वि. मा. बिवलकर)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती),
संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे (१० प्रती)
सर्व संचालक / सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
सर्व विभागीय आयुक्त (सर्व),
विभागीय कृषि सहसंचालक (सर्व),
जिल्हाधिकारी (सर्व) (बृहन्मुंबई व मुंबई उपनगर हे जिल्हे वगळून)
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व) (बृहन्मुंबई व उपनगर हे जिल्हे वगळून)
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व) (बृहन्मुंबई व उपनगर हे जिल्हे वगळून)
कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
व्यवस्थापकीय संचालक, कृषि उद्योग विकास महामंडळ मर्यादित, आरे दुग्ध कॉलनी गोरेगाव (पूर्व), मुंबई-६५

मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
व्यवस्थापकीय संचालक, कृषि उद्योग विकास महामंडळ मर्यादित, आरे दुग्ध कॉलनी
गोरेगाव (पूर्व), मुंबई-६५
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, महाबीज भवन,
कृषि नगर, अकोला
संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला,
मंत्रालयासमोर, मुंबई (२ प्रतीत)
महालेखापाल (लेखा परिक्षा /लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
सामाजिक न्याय, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
वित्त विभाग, व्यय-१, अर्थसंकल्प-३, अर्थसंकल्प-१२३
सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव / कार्यासन अधिकारी,
कृषि व पदुम विभाग ( कृषि व फलोत्पादन)
मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
निवडनस्ती.